वन प्रशिक्षण शाळा व महाविद्यालयाचा विस्तार व नवीन वन शिक्षण वृत्ताची स्थापना॰ या योजनेतर योजनेखाली ३ अस्थायी पदांना सन २०१८-१९ मध्ये मुदतवाढ देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग,
शासन निर्णय क्रमांक :-एफडीएम २०१८/प्र.क्र.३४/फ-२
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- २० ऑक्टोबर, २०१८

वाचावे :- १) शासन निर्णय क्रमांक, असंक-१००४/प्र.क्र.१२ (भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दि.०४.१०.२००४

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.१९/१७-१८/२३२४,दि. १४.०३.२०१८.

३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. एफडीएम-२०१८/प्र.क्र.३४/फ-२, दि.३१.०३.२०१८

४) शासन निर्णय,वित्त विभाग, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०७.०९.२०१८

५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-३/यो/प्र.क्र.१ /१८-१९/११०१/१८-१९, दि.२४.०९.२०१८

शासन निर्णय :-

वन प्रशिक्षण शाळा व महाविद्यालयाचा विस्तार व नविन वन शिक्षण वृत्ताची स्थापना या योजनेतर योजनेखाली संदर्भ क्र.३ येथिल दि.३१.०३.२०१८ च्या शासन निर्णयान्वये ३ अस्थायी पदांना सन २०१८-१९ मध्ये दि.०१.०३.२०१८ ते दि.३०.०९.२०१८ पर्यंत सदर पदे चालू ठेवण्यास शासनाची मान्यता देण्यात आली होती. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.२ व ५ येथिल दि.१४.०३.२०१८ च्या व दि.२४.०९.२०१८ रोजीच्या पत्रान्वये ३ अस्थायी पदांना सन २०१८-१९ मध्ये पुढे चालू ठेवण्याबाबत शासनास प्रस्ताव सादर केला आहे.

उक्त पार्श्वभूमीवर खाली दर्शविलेल्या विवरण पत्रातील ३ अस्थायी पदे वन विभागाच्या २५०२५ या मंजूर आकृतीबंधात समाविष्ट असल्याने संदर्भ क्र. २ व ५ येथील पत्रान्वये प्राप्त प्रस्तावाच्या अनुषंगाने दि. ०१.१०.२०१८ ते दि.२८.०२.२०१९ पर्यंत सदर पदे चालू ठेवण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | पदनाम | वनप्रशिक्षण संस्थेचे नाव | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १. | सहायक वनसंरक्षक | वनप्रशिक्षण संस्था, चिखलदरा | १ |
| २. | सहायक वनसंरक्षक | दा.चौ. वनप्रशिक्षण संस्था, पाल | १ |
| ३. | सहायक वनसंरक्षक | वनप्रशिक्षण संस्था, जालना | १ |
| | | एकूण | ३ |

२. या पदांवर होणार खर्च -प्रधान शिर्ष २४१५ कृषीविषयक संशोधन व शिक्षण (योजनेत्तर) ०६ वनीकरण, २७७ शिक्षण, (००) (००) (०१) वनक्षेत्रपालांसहीत वनाधिकाऱ्यांचे प्रशिक्षण ०१ वेतन (२४१५ ०४८२) ०१ वेतन या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ मध्ये उपलब्ध होणा-या अनुदानातून भागविण्यात येईल.सदर कालावधी मध्ये त्यांच्या आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घेवून सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक आहे. या नंतर सुधारीत आकृतीबंध निश्चीत करण्याकरीता कालावधी वाढवून देण्यात येणार नाही. तसेच आस्थापनेवरील पदांचा आढावा घेवून, सुधारीत आकृतीबंधाचा प्रस्ताव वित्त विभागास सादर करावयाचा असल्याने त्वरीत कार्यवाही करुन शासनास प्रस्ताव सादर करावा.

३. प्रस्तुत शासन निर्णय हा वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. शासन निर्णय,वित्त विभाग, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.०७.०९.२०१८ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०२०१७१५१५५२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Atul Ashok Kode

Digitally signed by Atul Ashok Kode
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a12403ed93b05957cb29b7e95265d3ac52d366233b80405514f23a879132aeec, serialNumber=f0d5ee4c99cc9cbfa8761b3ddc7bd6650bad33302f33a35400ad5aad2291371a, cn=Atul Ashok Kode
Date: 2018.10.20 17:23:55 +05'30'

**(अतुल कोदे)**
सह सचिव
महसूल व वन विभाग

**प्रतिलिपी** :-

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
३) अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) सर्व मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव / प्रादेशिक)
५) मुख्य वनसंरक्षक, वनशिक्षण वृत्त, पुणे
६) संचालक, वनरक्षक प्रशिक्षण संस्था, चिखलदरा/जालना
७) संचालक, दादासाहेब चौधरी वनप्रशिक्षण संस्था, पाल
८) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
९) वित्त विभाग, व्यय १०/अर्थसंकल्प-६/वित्तीय सुधारणा, मंत्रालय, मुंबई
१०) कार्यासन अधिकारी, ब-१ महसूल व वन विभाग, मंत्रालय मुबई
११) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई